# ‘भीमसेनांचं पुण्यस्मरण’

------------------------------------------------------------------------

२४ जानेवारी २०१२ रोजी भारतरत्न, स्वरभास्कर पं.भीमसेन जोशी हयांच्या निधनाला एक वर्ष पूर्ण होईल.हया वर्षभरात अनेकांनी विविध कार्यक्रम केले व त्यांना आदरांजली वाहिली.अनेकांनी आपल्या आवाजात त्यांची गाणी गायचा प्रयत्न केला.पण तो ‘ज्योतीने तेजाची आरती’ असाच प्रकार होता.आमच्या ‘सोसायटी ऑफ इंडियन रेकॉर्ड कलेक्टर्स’ तर्फे वीसेक कार्यक्रम दृक-श्राव्य माध्यमातून करण्यात आले.त्यांना बरीच गर्दी झाली होती.अगदी अमेरिकेत सिॲटल व सॅन होजे यथेही दोनशे श्रोते उपस्थित होते.तिथे सुद्धा चाळीस पन्नास मैल प्रवास करून काही मंडळी आलेली होती.हया निमित्तानं पंडितजींच्या जुन्या व नवीन ध्वनिमुद्रणांची बरीच माहिती संकलित झाली.आधुनिक तंत्राच्या महाजालात त्यांच्या चाहत्यांनी शेकडो तासांची ध्वनिमुद्रणं, छायाचित्रं व लिखाण साठवून ठेवलेलं आहे.त्यांचा पण शोध घेता आला.

पंडितजी गेले त्याच रात्री दूरदर्शनवरून त्यांना श्रद्धांजली म्हणून १९८० च्या आसपासची ‘पूरिया धनाश्री’ची ध्वनिचित्रफीत दाखविण्यात आली.ब्लॅक अँड व्हाईट टी.व्ही.च्या जमान्यातली.अगदी अंधाऱ्या स्टुडियोत एका कॅमेऱ्यावरचं चित्रण.एखाद्या गुहेतलं वाटावं असं.कलाकारांवर जेमतेम प्रकाश.गायकालाच एकमेव माईक.सरकारी कारभार असल्यानं त्यांच्या पद्धतीनं चित्रीकरण व सादरीकरण.समोर कुणीही ऐकायला नाही.पण पंडितजींचं गाणं जणु हजारो रसिकांच्या पुढं चाललंय असं.पेटीवर एकनाथ ठाकूरदास, तबल्यावर नाना मुळे तर तानपुरा व गायनसाथीला रामकृष्णबुवा पटवर्धन व वत्सलाबाई जोशी.वीसेक मिनिटाचं गाणं.अंतःकरणाला आरपार जाऊन भिडणारं.वयाची साठी ओलांडल्यानंतरचं.द्रुत बंदिशीतल्या ‘पिया समझाए, समझत नाही’ला साथीचा सूर हवा तसा न लागल्यानं वत्सलाबाईकडं नाराजीचा कटाक्ष.पुढच्याच क्षणी अपेक्षित साथ मिळताच मान डोलावून दिलेली दिलखुलास पसंती.पुन्हा पुन्हा पहावी अशीच.ही ध्वनिचित्रफीत पहात असतानाच अश्या अनोख्या मुद्रणांचा मागोवा घ्यायचा संकल्प सोडला व रीतसर ‘गूगल सर्च’ वर नोंदणी करून टाकली.त्यामुळं सायबरविश्वात नवीन काही टाकलं गेलं (अपलोड झालं) की त्याची सूचना वेळोवेळी मिळू लागली.त्यातनं अनेक रत्नं हाती लागली.

काही दिवसातच एक अनोखी चित्रफीत पहायला मिळाली.मुंबईच्या चौपाटीवर वाळूत पंडितजींचं एक भव्य शिल्प साकारत होतं.कुणी अनाम कलाकार रेतीतून साकारलेल्या त्या अदभुत शिल्पावर शेवटचा हात फिरवीत होता.ऊंचावरून त्याचं चित्रीकरण होत होतं.बरीच गर्दी होती.पार्श्वभूमीवरती पंडितजींच्या गोड आवाजातलं यमन रागातलं भजन ऐकायला येत होतं - ‘श्याम बजाए आज मुरलिया’.काही दिवसांनी एका मराठी वाहिनीवरची बातमी पहायला मिळाली.पुण्यात पर्वतीपाशी एका उद्यानात ‘भीमसेन जोशी’ कलादालनाचं उदघाटन चालू होतं.मुख्यमंत्री महोदयांच्या हस्ते.दर्शनी भागात भिंतीलगत सोन्याच्या रंगातला पंडितजींचा भव्य पुतळा.बाजूच्या दालनात त्यांच्या ध्वनिमुद्रिकांचं सुरेख प्रदर्शन.मंत्रीगणांची लगबग व भाषणं.मंचावर समूहनृत्य.‘मन हो राम रंगी रंगले’ हया पंडितजींनी गायिलेल्या पदाच्या रिमिक्सवर थिरकणारी पावलं.

चौपाटीवरचा अनामिक वालुकाशिल्पी ते मुख्यमंत्री हया सर्वच स्तरांतली पंडितजींची लोकप्रियता पाहून चकितच झालो. एका ब्लॉगवरती संदर्भ मिळाला म्हणून वसंत पोतदार यांनी लिहिलेलं 'भीमसेन' नावाचं पुस्तक मिळवून वाचलं. त्यात बंगाली गानरसिकांनी दिलेलं मानपत्र वाचायला मिळालं. त्यात पंडितजींचा 'प्रवाद पुरूष' असा उल्लेख आढळला. हा शब्द मराठीत तरी काही चांगल्या अर्थानं घेतला जात नाही. म्हणून लगेचच स्पष्टीकरण. बंगालीत 'प्रवाद पुरूष' म्हणजे ज्याच्या विषयी कोणताच 'प्रवाद' नाही तो. असा पुरूष जनसामान्यांपासून ते अभिजनांपर्यंत सगळयांनाच 'आपला' वाटतो. किती नेमकं व सार्थ वर्णन आहे पंडितजींचं. त्याचा पडताळा लगेचच यायचा होता.

सायबर विश्वातनं सूचना आल्यानं १९७५ च्या आसपास चित्रीत झालेली एक कृष्ण धवल व्हिडियो पहायवास मिळाली. 'तीर्थ विठ्ठल क्षेत्र विठ्ठल' हया पंडितजींच्या गाजलेल्या अभंगाची. सवाई गंधर्व पुण्यतिथीचा 'ऊरूस' किंवा 'महोत्सव' होण्याच्या अगोदरच्या जमान्यातली. ती पहात असताना श्रोत्यात बसलेल्या एका आजींनी लक्ष वेधून घेतलं. 'अरे हया तर आमच्या राधाकाकू' असे शब्द मनात उमटले. त्या पुण्यात आमच्या घरी पोळया करायला यायच्या. १९६५ च्या सुमारास शाळेत असताना. त्यांच्या हातच्या घडीच्या मऊसूत पोळया आजही आठवणीत आहेत. त्यावेळी सवाई गंधर्व पुण्यतिथी गावातल्या मुलींच्या भावे स्कूलच्या चिमुकल्या मैदानात साजरी होत असे. आमच्या घराच्या मागेच ही पर्वणी असे. पण तिकिट काढून जाणं परवडत नसल्यानं पहाटे केव्हातरी घुसत असू. भीमसेनांचं गाणं शेवटच्या दिवशी सुरू असलं की तिकिटं कुणी पहात नसे. पण हया राधाकाकू मात्र बाहेर उभ्या राहून गाणं ऐकायच्या. त्या दिवशी कामाला त्यांची हमखास दांडी असे. एकदा धीर करून त्यांना विचारलंच की शास्त्रीय गाण्यातलं त्यांना काय समजतं म्हणून. तर त्यावर म्हणाल्या, 'सुरेशा. त्या रागाबिगातलं मला मेलीला काय समजणार. ते संपायचीच मी वाट पहात असते. कारण त्यानंतर 'विठ्ठला'चा अभंग म्हणतात ना. तेव्हा मला अगदी पांडुरंगाचं दर्शन होतं बघ. उभ्या आयुष्यात पुणं सोडून कुठंही बाहेर न गेलेल्या राधाबाईसारखी अनेक मंडळी होती. आजही आहेत. त्यांच्या साठी पंडितजींचं गाणं हे सुखनिधानच. समाजाच्या सगळया थरातल्या श्रोत्यांना सामावून घेणारं असं.

काही दिवसांनी कॅनडातल्या एका मुलीनं आपल्या वडिलांच्या स्मृतीसाठी बनवलेल्या एका वेब साईटवरची माहिती पहायला मिळाली. जेम्स विव्हरिज हे त्यांचं नाव. हे गृहस्थ म्हणजे कॅनेडियन डॉक्युमेंटरी विश्वाचे जनक व सर्वेसर्वा. १९७२ च्या सुमारास ते भारतात आले असताना काही मोजक्याच गायक व वादकांवर त्यांनी अर्ध्या तासांच्या डॉक्युमेंटरी फिल्मस बनविल्या. त्यात पंडितजींच्या मिया की मल्हारची रंगीत फिल्म आहे. पन्नाशीतलं ऐन बहरातलं आक्रमक, जोशपूर्ण व परिपक्व गाणं. साथीला एकनाथ ठाकूरदास व तबल्यावर चंद्रकांत कामत. गायन साथीला माधव गुडी व वत्सलाबाई. मोजक्याच मंडळींसमोर लक्ष्मी रोडवरच्या डॉ. गोखले हयांच्या घरी झालेलं. पंडितजींचा मुद्राभिनय व हातवारे, सटटयाच्या ताना हे सारंच विलोभनीय. पुन्हा पुन्हा पहात राहावं असं. हया व्हिडियोत त्यांनी व दिग्दर्शक जेम्स हयांनी आपलं सर्वस्व पणाला लावलंय हे जाणवतं. मियाँ मल्हार रागाच्या सादरीकरणात हिंदू बौद्ध व मुसलमान धर्म व संस्कृतीतली कितीतरी स्थळं इथं पहायला मिळतात. त्याचबरोबर पावसाची दुष्यं. एका परदेशी माणसानं हे सारं इतका खोलवर विचार करून मांडलेलं पाहून आश्चर्य वाटतं.

भक्तिसंगीतातून पंडितजींनी जनसामान्यांच्या मनात कायमचं घर केलेलं असलं तरीही चित्रपटगीतांच्या माध्यमातून ते ख-या अर्थानं देश विदेशात पोहोचले.१९५२ ते १९८८ या काळात त्यांनी वीसेक बोलपटांतून केवळ पस्तीस गाणीच गायली आहेत.त्यातही मराठी बोलपट १४ असून हिंदीत 'बसंत बहार' व 'अनकही' हया दोनच बोलपटांत ते गायले आहेत.पण 'अनकही' तल्या गाण्याकरिता सर्वोत्कृष्ट पार्श्वगायकाचा पुरस्कार (प्रेसिडेंटस अॅवॉर्ड) त्यांना मिळाला होता.त्याचा व 'केतकी गुलाब जूही' हया मन्ना डे हयांच्या बरोबरच्या जुगलबंदीचा किस्सा गुलजार यांनी बनविलेल्या डॉक्युमेंटरीतून मुळातूनच बघावा.सायबरविश्वातल्या दुनियेत.याशिवाय दोन कानडी बोलपटांत त्यांचं अगदी तरूणपणातलं गाणं ऐकायला मिळतं.तर 'बिरबल माय ब्रदर' बोलपटात पं.जसराजांचे बरोबर 'मालकंस' मधली जुगलबंदी झकास जमून आली आहे.

सवाई गंधर्व महोत्सवाच्या व्हिडियोज पुण्याच्या अलूरकर यांचेतर्फे प्रकाशित होत.त्यातली बरीचशी मुद्रणं आता नेटवरती आढळतात.त्यात अगदी पहिल्या काळातलं तरूणपणातलं 'आसावरी तोडी' व 'बिन देखे पडे नाही चैन' हया भैरवी ठुमरीचं मुद्रण खास आहे.सकाळची वेळ आहे.पेटीवर अप्पा जळगावकर तर तबल्यावर केशव बडगे.तानपुरा व गायन साथीला माधव गुडी व श्रीकांत देशपांडे.मंचावर पंडितजींच्या मागे घरातली छोटी मुलं व रसिकाग्रणी दत्तोपंत देशपांडे दिसताहेत.पंडितजी गाण्यात रंगून गेलेले.मधूनच टॉवेलने घाम पुसताहेत.अप्पा पेटीच्या भात्यावरचा हात मध्येच सोडून दाद देत आहेत.भारतीय बैठक मारून श्रोते सूरसागरात विलीन झालेले दिसताहेत.आणखी एका संकेत स्थळावर अगदी शेवटच्या हजेरीत मोठया मुष्किलीनं पाचेक मिनिटं 'मुलतानी' आळवताना पंडितजी दिसतात.

नव्वदच्या दशकात बालमुरली कृष्णांचे बरोबर मुबईतल्या षण्मुखानंद सभागृहात उत्तर व दक्षिण भारतीय संगम संगीतची अनोखी मैफल झाली.त्याचेही व्हिडियो तुकडे 'यू टयूबवर' आहेत.त्याच सुमारास एन.सी.पी.ए.त हुसेनांचं पेंटिंग व पंडितजींचं गाणं असा आणखी एक प्रयोग झाला होता.त्याचं मुद्रण मात्र अजून तरी कुणी अपलोड केलेलं नाही.२००२ च्या आसपास कलकत्ता येथे किराणा घराण्याच्या संगीतावर चर्चा झाली.त्यात पं.फिरोझ दस्तूर गायले.किराणा गवयांच्या ध्वनिमुद्रिकांवरती चर्चा झाली व शेवटी पंडितजी 'शुद्ध कल्याण' हा त्यांचा पेटंट राग अप्रतिम गायले.त्याचं दूरदर्शननं लाइव्ह टेलिकास्ट केलं.पण ते अजून पर्यंत तरी अपलोड झालेलं नाही.गाण्याबरोबर दिलखुलास मुलाखती देण्यात पंडितजी प्रसिद्ध होते.जी.एन.जोशी हयांनी घेतलेली दोन भागातली रेडियोवरची मुलाखत फर्मास.डॉ.अशोक रानडे हयांनी पंडितजींच्या उतारवयात टी.व्ही.करिता मराठी व हिंदीतून मुलाखत घेतली.त्यात एकमेकांना चिमटे काढत, गाण्यातलं मर्म उलगडत व दाद देत दोघेही अतिशय रंगून गेलेले आहेत.अश्याच एका जुन्या टी.व्ही.मुलाखतीत आगाऊ प्रश्णकर्त्याच्या 'इतरांच्या तुलनेत आपल्या परदेशवा-या कमी का?' अश्या काहीश्या बोच-या व वारंवार आलेल्या प्रश्णाला 'कावळे पण पोचतात की एक दिवस उडत उडत तिकडे' असं उत्तर दिल्याचं अनेकांना आठवत असेल.ती ध्वनिचित्रफीत मात्र काळाच्या उदरात गडप झालेली दिसते.

'प्रवाद पुरूषा'ची काही खास ऑडियो व व्हिडियो ध्वनिमुद्रणं मोजक्या संग्राहकांकडं उपलब्ध आहेत. एकमेकांत त्यांचं मोठया प्रेमानं आदान प्रदान होत असतं. त्यात अगदी जुनं १९६0च्या आसपासचं पुण्यातलं गाणं आहे. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या एका निधी संकलनासाठी यादवराव जोशी हयांनी आयोजित केलेल्या त्या कार्यक्रमात पंडितजींचं सुरूवातीला मनोगत आहे. आजच्या गाण्याची बिदागी पदरचा एक रूपया घालून हया फंडाला देऊन टाकल्याची घोषणा केल्यावर पंडितजी आर. एस. एस. च्या ध्येयधोरणांविषयी काही शंका उपस्थित करतात. आपल्या मिष्किल पण निर्भिड शैलीत. हे धाडस मात्र दाद देण्याजोगं. हे प्रास्ताविक आटोपल्यावरती 'सूर्यकंस' हया फारश्या प्रचारात नसलेल्या दक्षिणेकडच्या रागाचं तासभराचं अफलातून गाणं. मन प्रसन्न करून सोडणारं.

आपल्याकडं दूरदर्शन रंगीत झाल्यावरती अगदी सकाळी 'सुप्रभात' नावाचा कार्यक्रम दाखवत. त्यात विख्यात गायक वादकांची पाच पाच मिनिटांची चित्रीकरणं असत. दुर्दैवानं ती सगळी इतिहासजमा झाली. पण एकदा मुंबईच्या चोर बाजारातून गोणी भरून व्ही. एच. एस. टेपस मिळाल्या. त्यांच्यावरची बुरशी वगैरे साफ करून बघितल्या. कुण्या संगीत प्रेमी माणसानं अगदी नित्यनेमानं रोजचं प्रक्षेपण मुद्रित करून ठेवलेलं होतं. त्यात पंडितजींचा जोगिया पहायला मिळतो. दिल्लीतल्या तीन मूर्ती भवनाच्या उद्यानातलं भल्या पहाटेचं विशेष श्रद्धांजलीचं गाणं पहायला मिळतं. शुभ्र बिछायतीवर व अगदी धीर गंभीर वातावरणातलं. टाळयांचा कडकडाट नाही की अतिरेकी दाद देणं नाही. श्रोत्यांत दूरवर तरूण अमिताभ बच्चन दिसतात. तर समोर सोनियाजी व प्रियांका गांधी. निमित्त राजीव गांधींच्या पहिल्या पुण्यतिथीचं. राजीवजी पंडितजींच्या गाण्याचे चाहते. पंडितजींनी राज्यसभेत यावं याकरिता गळ घातली. त्यावर 'माझ्या मागं सुरेल जुळलेले दोन तानपुरे हयाच माझ्या लोकसभा व राज्यसभा. तिथं मी आनंदानं राज्य करतो आहे. यातून मला बाहेर ओढू नका.' असं नम्रपणे सुचविणारे पंडितजी. भारतरत्न पुरस्काराचं पण त्यांच्यापेक्षा इतरांनाच फार अप्रूप होतं.

'गाताना मला आनंद होतो आहे की नाही हे मी आधी पाहतो. तो होत असेल तर श्रोत्यांना होणारच'. इतकी साधी व सोपी भूमिका पंडितजी नेहमीच मांडत असत. हा अनुभव त्यांच्या मैफिलीत अनेकदा येत असे. आता सायबर विश्वातल्या शेकडो तासांच्या ध्वनिचित्रफीती पाहताना पण तसाच अनुभव येत आहे.

डॉ. सुरेश चांदवणकर
१0 जानेवारी २0१२
chandvankar.suresh@gmail.com